**केंद्र पुरस्कृत योजना सन २०१८-१९**
**"व्याघ्र प्रकल्प" योजनांतर्गत मेळघाट व्याघ्र प्रकल्पाकरीता निधी वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन निर्णय क्र. डब्ल्यूएलपी-०८.१८/प्र. क्र. २८६/फ-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई ४०००३२.
दिनांक :- २२ फेब्रुवारी, २०१९.

वाचा :-

१. वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक :- अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दिनांक :- ०२.०४.२०१८.
२. केंद्रीय पर्यावरण, वन आणि हवामान बदल, मंत्रालय, नवी दिल्ली यांचे पत्र क्रमांक ४-१(१०)/२०१८-पीटी, दिनांक :- २५.०७.२०१८.
३. शासन निर्णय क्र.डब्ल्यूएलपी-०८.१८/प्र.क्र.२८६/फ-१,दिनांक २८.०८.२०१८.
४. केंद्रीय पर्यावरण, वन आणि हवामान बदल, मंत्रालय, नवी दिल्ली यांचे पत्र क्रमांक ४-१(१०)/२०१८-पीटी, दिनांक :- ०२.०१.२०१९.
५. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्रमांक कक्ष-१/सी/यो/प्र.क्र.१२/MTR/१८४५/१८-१९, दिनांक १७.०१.२०१९.

प्रस्तावना :-

"व्याघ्र प्रकल्प" योजनांतर्गत पूर्वी केंद्र शासनाकडून अनावर्ती बाबींकरीता २४०६ १२४३ या लेखाशिर्षातंर्गत १००% केंद्र अनुदान उपलब्ध करुन दिले जात होते. तथापि सन २०१६-१७ मध्ये सदर योजनेच्या हिस्सा पध्दतीमध्ये बदल करण्यात आल्याचे केंद्रीय पर्यावरण, वन आणि हवामान बदल मंत्रायल, नवी दिल्ली यांनी सूचविले. त्या नुसार सन २०१६-१७ मध्ये व्याघ्र प्रकल्प या योजनेकरीता केंद्र हिस्सा ६०% अंतर्गत २४०६ १२४३ हे लेखाशिर्ष तर त्याच अनुरुप राज्य हिस्सा ४०% अंतर्गत २४०६ A१०२ या लेखाशिर्षाचा व आवर्ती बाबींकरीता केंद्र हिस्सा ५०% अंतर्गत २४०६ ए१२२ हे लेखाशिर्ष तर त्याच अनुरुप राज्य हिस्सा ५०% अंतर्गत २४०६ A१३१ या लेखाशिर्षाचा वापर करण्यात येत आहे.

२. सन २०१८-१९ या आर्थिक वर्षाकरिता केंद्र पुरस्कृत योजना-व्याघ्र प्रकल्प अंतर्गत मेळघाट व्याघ्र प्रकल्पाकरीता केंद्र शासनाने संदर्भ क्रमांक २ च्या पत्रान्वये रु. १२६६.४३ लक्षचे कार्यबाबींस केंद्र शासनाने मंजूरी प्रदान केलेली आहे. केंद्र शासनाने सुधारीत केंद्र हिस्सा पध्दतीनुसार मेळघाट व्याघ्र प्रकल्पाकरिता संदर्भ क्रमांक ४ च्या पत्रान्वये सन २०१८-१९ मध्ये केंद्र हिस्स्याअंतर्गत आवर्ती व अनावर्तीबाबींकरीता दुसरा हप्ता रु. १३८.६६ लक्ष मंजूर केला आहे, त्या अनुषंगाने राज्य हिस्स्याअंतर्गत अनावर्ती + आवर्ती बाबींसाठी राज्य शासनास रु. ११४.६३ लक्ष असे एकूण रु. २५३.२९ लक्ष निधी मुक्त करणे अपेक्षित होते. तथापि उपलब्ध असलेल्या नियतव्यय लक्षात घेता सन २०१८-१९ मध्ये केंद्र हिस्स्याअंतर्गत आवर्ती व अनावर्तीबाबींकरीता दुसरा हप्ता रु. १२७.२४ लक्ष मंजूर केला आहे, त्या अनुषंगाने राज्य हिस्स्याअंतर्गत अनावर्ती + आवर्ती बाबींसाठी राज्य शासनास रु. १०३.०२ लक्ष असे एकूण रु. २३०.४४ लक्ष निधी मुक्त करणे अपेक्षित होते

## शासन निर्णय

सबब आता सदर शासन निर्णयान्वये वर नमूद केल्याप्रमाणे **रु. २३०.४४ लक्ष** संदर्भ क्रमांक ४ च्या पत्रान्वये केंद्रीय पर्यावरण, वन आणि हवामान बदल, मंत्रालय, नवी दिल्ली यांनी मान्यता दिलेल्या कार्यबाबींवर खर्च करण्यास खालील अटींच्या अधीन राहून शासनाची मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

अ) व्याघ्र प्रकल्प या केंद्र पुरस्कृत योजनेंतर्गत विकासात्मक कामांसाठी होणारा खर्च **I)** अनावर्ती बाबींसाठी केंद्र हिस्सा ६०% करीता रु. ७२.०७ लक्ष लेखाशिर्ष क्र. २४०६ वनीकरण व वन्यजीवन, ११० वन्यजीवनाचे संवर्धन, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, केंद्र पुरस्कृत योजना (००)(०४) व्याघ्र प्रकल्प (६० % केंद्रीय अनुदान) (२४०६ १२४३) **II)** त्या अनुरुप राज्य शासनाचा राज्य हिस्सा ४० % करीता रु. ४८.०५ लक्ष लेखाशिर्ष क्र. २४०६ वनीकरण व वन्यजीवन, ११० वन्यजीवनाचे संवर्धन, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, राज्य योजना (००)(२१) व्याघ्र प्रकल्प (४० % राज्य हिस्सा) (२४०६ ए१०२) **III)** आवर्ती बाबींसाठी रु. ५५.१५ लक्ष लेखाशिर्ष २४०६ वनीकरण व वन्यजीवन, ११० वन्यजीवनाचे संवर्धन, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, केंद्र पुरस्कृत योजना (००)(२३) व्याघ्र प्रकल्प (५० % केंद्रीय अनुदान) (२४०६ ए१२२) **IV)** त्या अनुरुप ५० % राज्य हिस्सा रु. ५५.१५ लक्ष लेखाशिर्ष २४०६ वनीकरण व वन्यजीवन, ११० वन्यजीवनाचे संवर्धन, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, राज्य योजना (००)(२४) व्याघ्र प्रकल्प (५० % राज्य हिस्सा) (२४०६ ए१३१) सन २०१८-१९ मध्ये अर्थसंकल्पित वितरण प्रणालीद्वारे उपलब्ध होणा-या अनुदानातून खर्च करण्यात यावा.

आ) सदर शासन निर्णयान्वये विरतीत केलेला निधी केंद्र शासनाने संदर्भीय पत्रान्वये मान्यता दिलेल्या तपशीलवार कार्यबाबींवर व सदर कामांना सक्षम प्राधिका-याची प्रशासकीय व तांत्रिक मान्यता असल्याखेरीज रक्कम खर्ची टाकण्यात येऊ नये.

इ) वितरीत केलेला निधी केंद्र शासनाने दिलेल्या मान्यतेनुसार योजनेस विहीत केलेल्या मर्यादेत, प्रचलित नियमांच्या अधीन राहून व वित्त विभागाने वेळोवेळी विहीत केलेल्या मार्गदर्शक तत्त्वानुसार तसेच केंद्र शासनाने प्रस्तावात नमूद केलेल्या कार्यबाबींच्या अनुषंगाने खर्च करण्यात यावा.

ई) प्रस्तावित असलेल्या मोठया बांधकामासाठी शासनाने दिलेल्या सूचना आणि विहीत केलेली कार्यपद्धती अनुसरण्याची संबंधीत नियंत्रक/अंमलबजावणी अधिकारी यांची राहील.

उ) वित्त विभागाने निर्गमित केलेल्या विविध मार्गदर्शन सूचनांचे, वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक :- अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दिनांक ०२.०४.२०१८ च्या परिपत्रकाचे काटेकोर पालन करावे.

ऊ) प्रस्तुत प्रकरणी केंद्र शासनाचा हिस्सा व राज्य शासनाचा हिस्सा मधील अंतर्भूत १० % Flexi Fund **बाबत केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनांनुसार कार्यवाही करावी**.

२. सदर शासन निर्णय वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक :- अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दिनांक ०२.०४.२०१८ला अनुलक्षून निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०२२२११२७५३९०१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Swapnil Deshbhratar

Digitally signed by Swapnil Deshbhratar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9add558653210cf44615291102f1bf143783e8403be64c06c7928e692d77c386, cn=Swapnil Deshbhratar
Date: 2019.02.22 11:29:44 +05'30'

**(स्वप्निल देशभ्रतार)**
विशेष कार्य अधिकारी,
महसूल व वन विभाग

**प्रति,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक ( अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
४. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), पूर्व, नागपूर.
५. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक, मेळघाट व्याघ्र प्रकल्प, नागपूर.
६. महालेखापाल-१/२ (लेखापरीक्षण /लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
७. फ-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२ (निवडनस्ती).